## सत्यनारायणाच्या पोथीतील (परी) कथा!

खट्टर काका मोठ्या ग्लासमधून लस्सी पीत बसले होते.
मी म्हणालो “काका आज आमच्या घरी सत्यनारायणाची पूजा आहे. आपण आलात तर ....”
“खर की काय? परंतु सत्याच्या नावे असत्याची पूजा तर होणार नाही ना?”
“काका, काही तरीच बोलता! अशी परमेश्वराची थट्टा करू नये....”
काका हसतच, “परमेश्वराची थट्टा तुम्ही करत असता. मी नव्हे...”
“आम्ही कसे?”
“आता तुमची या पूजेची पद्धतच बघा! देवाची षोडषोपचार पूजा कशी होते? पहिल्यांदा देवाचे स्वागत करून त्याला आसनस्थ केले जाते. मग पाय धुण्यासाठी पाणी, मुख प्रक्षालनासाठी आचमन, आंघोळीसाठी गावातील (गंगे-यमुनेचे!) पाणी, नवीन कपडे, फुलं, हार, चंदन, धूप, कापूर, ऊदबत्ती इत्यादी सुगंधी द्रव्यांचे अर्पण, त्यानंतर मिष्टान्न नैवेद्य. तुपात तयार केलेले पक्वान्न, खीर, इत्यादी पदार्थांचा आनंद घ्यावा अशी देवाला विनंती, खरे पाहता पक्वान्नावर ताव मारणारे दुसरेच असतात. या जेवणानंतर देवाला लवंग, वेलदोडे, सुपारी घालून केलेला विडा.... असे करून देवाला खूष केले जाते. शेवटी सर्व जण उभे राहून घंटा वाजवत स्वस्थानं गच्छ! अपराधं क्षमस्व! असे म्हणत देवाला निरोप देतात. काही चुकल्यास क्षमा कर अशी विनवणी करतात ...
याला थट्टा म्हणायचे नाही तर काय म्हणायचे? या गोष्टी कुणासाठी केल्या जातात याचा कधी विचार केला आहे का? दगडाला शेंदूर फासायचे व म्हणायचे देव प्रकट झाला. मोठ मोठ्या दगडी, संगमरवरी, पितळी, शाडूच्या मूर्ती करायच्या आणि म्हणायचे की नवसाला पावणारा देव.. हे काय चाललय...? ”
“अहो काका, भलतच काय बोलता? या मूर्ती प्रत्यक्ष भगवान विष्णू किंवा शंकर यांची प्रतीकं आहेत.”
खट्टर काका हसत हसतच, “या दगडी, पितळी, संगमरवरी मूर्ती आपण सजवतो, त्यांची मिरवणूक काढतो जत्रा भरवतो. जत्रेत कार्यक्रम करतो. प्रसाद म्हणून लाडू वाटतो. खरे पाहता या भक्तगणांना लाडूपेक्षा जत्रेतील तमाशाच्या बारीत जास्त रुची असते. परंतु थिएटरच्या तिकिटापेक्षा लाडू स्वस्त असतो. लोकं लाडूचा भक्तीभावाने स्वीकार करतात. ...
जत्रा म्हणजे वयस्करांचा पोरखेळ. बायका तर बाहुलीसारखे नटून थटून येतात. तुम्ही तर या देवाला तुमच्या मुलीचा सासरा असल्यासारखे वागवता.”
“म्हणजे काय? काका.. ”
“जरा बारकाईने बघा, तुम्हालाच कळेल. तुमचा जावई व सासरे तुमच्या घरी आल्यावर तुम्ही काय काय करता ते जरा आठवा. पहिल्यांदा त्यांना बसायला पाट देता. मग पाणी देता. त्यानतर आंघोळ,

नाष्टा, जेवणात मिठाई, जेवणानंतर चघळायला पान सुपारी. – यात हार तुऱ्यांचीच कमी असते – यानंतर काही चुकलं माकलं तर क्षमायाचना. यात फक्त थोडासा फरक आहे. देवासमोरचे नैवेद्य आहे तसेच राहते व तुमचे सासरे बुवा आणि जावईबापू मात्र सगळे खाऊन फस्त करतात. कपडे म्हणून देवाला कापसाचे बोळे किंवा धागा दोरा चालतात. सासऱ्यांना मात्र कपडे लत्ते द्यावे लागतात. तासाभरात घंटा वाजवून देवळातून आपण बाहेर पडू शकतो. परंतु सासरच्यांना तुम्ही घरी जाऊ शकता असे काही सांगू शकत नाही. देव काही तुमचा सासरा नाही. खरे पाहता संबंधिक हा तुमच्या इतकीच बुद्धी असलेली व्यक्ती. जर या देवाला तुमच्या इतकीच अक्कल असेल तर त्याचेच रक्षण कुणाला तरी करावे लागेल."

"परंतु या सत्यनारायण पूजेबरोबर कथा पण सांगितली जातेच की... "

"हो. पूजा नाटक असल्यास कथा ही कादंबरी असते. ऐकणाऱ्यांना गंमती जंमती ऐकायला मिळतात."

"काका, या कथेमागे काही तरी अर्थ असावा...."

काकानी तेथेच असलेल्या सत्यनारायण कथेचे पान उचलले.

"आज रात्री हे भटजी बुवा काय सांगणार आहेत ते जरा ऐक. एकदा नैमिषिक अरण्यात देव देवतांची सभा भरली होती. यच्चावत सगळे देव हजर होते. सभेत पृथ्वीतलावरील मानवाचे दुःख, दैन्य दूर करण्यासाठी कमीत कमी वेळ, पैसा व श्रम घेणाऱ्या दैवी उपायावर चर्चा चालू होती. सभेच्या अध्यक्षानी हाच प्रश्न नारदानी वैकुंठात विष्णूला विचारला होता अशी माहिती पुरविली. यासाठी सत्यनारायणाची पारंपरिक पद्धतीने पूजा केल्यास दुःखाचे निवारण होऊ शकते, असे खुद्द विष्णूनी नारदाला सांगितले. एवढेच नव्हेत तर पूजा कशी करावी व प्रसाद कसा करावा हा तपशीलसुद्धा त्यानी पुरवला होता. केळी, तूप, दूध, साखर, गव्हाचा रवा (गव्हाचा नसल्यास तांदळाचा) हे पदार्थ प्रसादासाठी वापरावे अशी देवाज्ञा होती.

खरे पाहता हा देव किती करुणाळू आहे हेही यातून कळते. कारण गव्हाचा रवा नसल्यास तांदळाचा किंवा साखर नसल्यास गूळ याची सवलत त्यानी दिली आहे. गंमत म्हणजे गौतम बुद्धाने स्वतःचे आयुष्य धोक्यात घालून तपश्चर्या केली व मानवी वेदना दूर करणारा अष्टांग मार्ग सुचवला. कदाचित बुद्धाचा हा मार्ग सत्यनारायण पूजेच्या मार्गापेक्षा फारच खडतर असावा. येथे फक्त गोड शिऱ्याचा प्रसाद वाटले की गरीबी दूर होणार. प्रत्येक जण हा प्रसाद भक्ती भावाने स्वीकारतो. पूजा म्हटले की थोडे फार नाचगाणे आले. ब्राह्मणाबरोबर मित्रमंडळीबरोबर, नातलगांबरोबर जेवणाच्या पंगती उठणार. हे सर्व केल्यास माणसाचे दुःख दूर होणार व त्याला मोक्षही मिळणार. त्यामुळे या सत्यनारायण पूजेपेक्षा दुसरा सोपा उपाय असूच शकत नाही.... "

"परंतु काका,... "

"परंतु, बिरंतु काही नाही. या उपायावर शंका घेणाऱ्यांचे समाधान करण्यासाठी या पूजेचे भक्कम पुरावे सत्यनारायण कथेत दिले आहेत. त्यामुळे भक्तांना ही पूजा कराविशी वाटते. "

.....

काकानी पुराणकथेतील आणखी चारेक पान उलटली. " यातील पहिली गोष्ट काशीच्या ब्राह्मणाची. दस्तुरखुद्द भगवान सत्यनारायणच माणसाचा वेष घालून भीक मागत असलेल्या ब्राह्मणाला प्रत्यक्ष भेटतात. *विष्णूचा अवतार असलेल्या सत्यनारायणाची पूजा कर. सत्यनारायण तुझी इच्छा पूर्ण करेल. त्याचे व्रत हे सगळ्यात श्रेष्ठ व्रत.* असे सांगतात. काही दिवसात त्या ब्राह्मणाचे दारिद्र्य दूर झाले. आणि तो सुख, समाधानाने व चैनीत राहू लागला. मृत्यूनंतर त्याला मोक्षही मिळाले. जंगलात जाऊन घोर तपस्या करणाऱ्यांनासुद्धा मोक्ष इतके सहजासहजी मिळत नाही. "

माझी चुळबुळ बघूनसुद्धा न बघितल्यासारखे करत काका पुढे सांगू लागले. "खरे पाहता काशीत भीक मागत फिरणाऱ्या ब्राह्मणांची संख्या काही कमी नाही. परंतु सत्यनारायण सर्व ब्राह्मणांचे कल्याण करण्याऐवजी एकाच ब्राह्मणांचे कल्याण का करतो? व त्याचा गरीबीवर उपाय काय तर स्वतःच्या वाईट स्थितीला देवाला दोष न देता त्याची यथासांग पूजा करणे. ते जाऊ दे. सत्यनारायण पूजेसारखा सोपा उपाय असूनसुद्धा या जगात इतके भिकारी का आहेत? इतके कष्टी जीवन का जगत आहेत? फक्त तूप, साखर, रवा दूध, केळी घालून प्रसाद व पूजा केल्यास त्यांचे सर्व कष्ट दूर होऊ शकतात हे त्यांना कळत नाही का? एकदाच हा उपाय केल्यानंतर आयुष्यभर तूप रोटी खाऊ शकतात. खरे की नाही? "

"अहो काका, या सर्व कथा अशाच प्रकारचे आहेत की काय?"

"सगळे तसेच. फक्त सत्यनारायणाची जाहिरात. या लाकूडतोड्याची गोष्ट ऐक. त्यानी पूजा केली. व लाकडाच्या मोळीला दुप्पट भाव मिळाला. ......

पुन्हा पूजा केली. त्याला मुलगा झाला. मृत्युनंतर मोक्षही मिळाले असेल कदाचित. याच्याप्रमाणे अंगध्वज राजाची सुद्धा कथा आहे. त्यानी पूजा केली. त्यालाही सर्व काही मिळाले..... संपत्ती मिळाली. त्याला राजपुत्र झाला. आयुष्यभर सुख भोगत राहिला. व मृत्यनंतर सत्यलोकी पोचला. ... हे चाललय तरी काय... एखाद्या दलालासारखे, एखाद्या विमा एजंटासारखे हा सत्यनारायण पटवत आहे."........

"काका, या कथा लहान मुलासाठी तर नाहीत ना?"

"खरेच त्या लहान मुलांसाठीच आहेत. हुबेहूब परिकथेसारखे. अजून एक कथा तू ऐकली असशीलच. त्या कथेत सत्यनारायणाचे खरे स्वरूप कळते."

"लीलावती कलावतीची गोष्ट......" मी म्हणालो.

"तू ऐकली असशीलच."

"मी नाही ऐकली. परंतु तुमच्या तोंडून ती गोष्ट ऐकण्यातली मजाच वेगळी..."

".... मग तू त्या व्यापाऱ्याची कथा ऐक. त्यानी सत्यनारायणाची पूजा केली. त्याची बायको, लीलावती गर्भवती झाली. सत्यनारायणाच्या कृपाशिर्वादाने तिला मुलगी झाली. त्याने तिचे नाव कलावती असे ठेवले. व्यापारी कलावतीच्या लग्नापूर्वी सत्यनारायणाची पूजा करण्याचा नवस बोलला.

परंतु दुर्दैववशात तो नवस विसरला. सत्यनारायणाला राग आला. त्यानी त्याला शाप दिला. *माझी पूजा विसरतोस काय बघ तुझा सर्वनाश होईल.*

आता पुढची गोष्ट ऐक. जावयाबरोबर हा व्यापारी सर्व मालासकट शेजारच्या राजाच्या ठिकाणी व्यापार करण्याच्या उद्धेशाने पोचला. त्या दिवशी तेथील राजा चंद्रकेतूच्या राजवाड्यात चोरी झाली. चोर, घाबरून चोरीचा सर्व माल व्यापारी व जावई जेथे राहते होते तेथे टाकून, पळून गेले. राजाचे शिपाई मुद्देमालासकट व्यापारी व जावयाला पकडून राजासमोर उभे केले. राजानी त्यांचे सर्व माल जप्त करून त्यांना शिक्षा सुनावली व तुरुंगात डांबून ठेवले.  ते रडू लागले. विनवणी करू लागले. परंतु हे सर्व सत्यनारायणाच्या इच्छेनुसार घडत असल्यामुळे राजा चंद्रकेतू ऐकण्याच्या मनस्थितीत नव्हता. सत्यनारायणाच्या प्रतापामुळे सगळ्यानी त्यांच्याकडे दुर्लक्ष केले. सब प्रभू की माया."

"परंतु यामुळे देवाची बदनामी होऊ शकते. त्याचे काय?"  माझा प्रश्न.

"त्यानी काय फरक पडतो – कारण प्रसाद खाणाऱ्या भक्तांची संख्या काही कमी नाही. जर देव निष्ठुर नसल्यास त्याची भीती कशी काय वाटणार? भक्तांना भीती वाटली नाही तर पूजा होणार कशी? सत्यनारायण हा काही लेचापेचा देव नाही. पोलीस इन्स्पेक्टरसारखा देव आहे.  रडत द्या किंवा हसत द्या. इन्स्पेक्टरला जे काही द्यायचे आहे ते पोचवायलाच हवे. त्यात हयगय नको. जर नाही पोचल्यास तुमच्यावर केस करेल. तुम्हाला तुरुंगात टाकेल. आणि तुम्ही मरेपर्यंत तुम्हाला त्रास देत राहील."

"मग अशा देवावर प्रेम कोण करेल?"

"भीती नसेल तर प्रेमही नसणार. जर भक्तांना या मूर्तीपासून काहीही मिळणार नाही असे वाटू लागल्यास सर्व मूर्तींना नदी नाल्यात फेकून देतील. विसर्जन करतील. त्यामुळेच सत्यनारायण सूडाने पेटला असेल."

"व्यापारी व जावईची जेलमधून कशी सुटका झाली?"

"हा कथेचा पुढचा भाग आणखी जास्त मनोरंजक आहे. आई लीलावती व मुलगी कलावती नवऱ्यांची वाट बघत होत्या. परंतु ते दोघेही तुरुंगात आहेत हे कळल्यावर त्यांना अतीव दुःख झाले. काय करावे ते सुचेना. एके दिवशी कलावती रात्री घरी उशीरा आली*. उशीर का झाला* असे आईने विचारल्यावर मुलीने *सत्यनारायण पूजेमुळे उशीर झाला* असे सांगितले. आईला एकदम नवसाची आठवण झाली. तिने सत्यनारायण पूजेचा थाट केला. *माझ्या नवऱ्याला व जावयाला क्षमा कर व त्यांना सुखरूप घरी येऊ दे,* अशी प्रार्थना केली.

सत्यनारायण प्रसन्न झाला. चंद्रकेतूच्या स्वप्नात येऊन त्या व्यापाऱ्यांना जेलमधून सोडून टाक व त्यांचा सर्व माल परत दे अशी आज्ञा केली. नाही तर तुझे राज्य व पत्नी – मुलं तुला सोडून जातील, अशी भीतीही घातली."

"असे कसे देव करू शकतो? हा तर शनीपेक्षा वाईट निघाला." माझी प्रतिक्रिया.

"कुणीही त्याच्या अधेमधे आले की अशीच दमबाजीची भाषा देव करत असतो. चंद्रकेतूची यात काय चूक? तरीसुद्धा चंद्रकेतूने व्यापाऱ्याला व त्याच्या जावयाला बिनशर्त जेलमधून सोडतो व दामदुप्पट माल देऊन *कृपाकरून तुम्ही तुमच्या गावी जा. मला शांतपणे जगू दे.* असे म्हणत निरोप घेतो."

"काका, यात चंद्रकेतूवर सत्यनारायण रागावण्याचे काहीही कारण नव्हते?"

"सत्यनारायणाला कलावतीचे तारुण्य संपत आले आहे व तिच्या नवऱ्याला राजाने कोंडून ठेवलेले लक्षात आले असेल. व त्यामुळे दया दाखवण्यासाठी त्याला हे सर्व करावे लागले असेल. हे त्याचेच कर्तृत्व होते हे तो सोईस्करपणे विसरला. सरड्याला रंग बदलण्यासाठी किती वेळ लागतो?

आपल्यातही अशा प्रकारचे पुरुष असतात. बायकोला ताट वाढायला उशीर झाल्यास मारहाण करणारे नवरे असतात. चांगला स्वयपाक करून घातल्यास बायकोच्या गळ्यात सोन्याचा हार घालणारे असतात. स्वयपाकात थोडेसे मीठ जास्त झाले तरी तोच हार हिसकावून घेणारेसुद्धा असतात. हा देवसुद्धा अशाच पुरुषांपैकी आहे. एकदा राग येतो, रागाच्या भरात शाप देतो. प्रार्थना, पूजा केल्यास काही क्षणातच तो खुष होतो.रागाच्या भरात व्यापाऱ्याला तुरुंगाची हवा खायला लावतो. व कलावती – लीलावती पूजा प्रार्थना केल्यावर प्रसन्न होऊन त्यांची तुरुंगातून सुटकाही करतो. हा देवासारखा नाहीतर एखाद्या दुष्ट राजासारखा वागतो."

काकाची गोष्ट अजून संपली नव्हती.

"जेव्हा व्यापारी माल नावेत भरून आपल्या गावाकडे निघतो तेव्हा हा सत्यनारायण माणसाच्या वेषात येऊन *या नावेत काय आहे*? म्हणून विचारतो.

एखाद्या परक्या ठिकाणी परका माणूस अचानकपणे असले काही विचारल्यास एखादा काय सांगतो? त्याला तेथून हाकलून देण्यासाठी काही तरी खोटे बोलून पाठवतो. त्याप्रमाणे हा व्यापारी नावेत घास – कडबा आहे म्हणून सांगतो. सत्यनारायणाला व्यापारी खोटे बोलल्याबद्दल राग येतो व तसेच होऊ दे म्हणून शाप देतो. नावेत सगळीकडे घासच घास. व्यापाऱ्याला रडू कोसळते. देव पाहत असतो. *मूर्खा, मला फसवतोस की काय हे सर्व माझे प्रताप आहेत. आता भोग शिक्षा.*

यातली मजेची गोष्ट म्हणजे हा सत्यनारायण वेष बदलून का जातो? हे तर चक्क फसवणूक आहे. आणि व्यापाऱ्यानी परक्या माणसाला खरे का सांगावे? हा काय देवाघरचा न्याय होऊ शकतो का? व्यापारी पश्चात्तापाने देवा मला क्षमा कर. मी तुझी पूजा करीन अशी विनवणी करतो. सत्यनारायण खूष होतो. त्याचा सगळा माल जसा होता तसे बदलून टाकतो."

"हे म्हणजे अगदी सेल्स टॅक्स ऑफिसरसारखे झाले."

"या देवाचे वर्तन असेच असते."

"मग व्यापारी व जावई घरी पोचले का?" माझी उत्सुकता.

"घाई करू नको. कथा संपली नाही. कलावतीला ते दोघे परत येत आहेत ही बातमी कळली. ती धावतच नदी काठी पळत पळत गेली. परंतु घाई गडबडीत सत्यनारायणाचा प्रसाद घेऊन जायचे हे विसरली. मग काय, सत्यनारायणातला पोलीस इन्स्पेक्टर जागा होतो. त्याला राग येतो. रागाच्या

भरात काठाजवळ येत असलेली नाव नदीत बुडते. कलावती रडू लागते. सत्यनारायण पुन्हा एकदा प्रत्यक्ष होत तू नवऱ्याला भेटण्याच्या गडबडीत माझा प्रसाद आणायचा विसरलीस. हा माझा घोर अपमान आहे. आता माझे ऐक. तू परत जा व प्रसाद घेऊन ये. तोपर्यंत तुझा नवरा व बाप नदीच्या तळाशी असतील. कलावतीसमोर दुसरा मार्ग नव्हता. पळत पळत घरी जाते. प्रसाद खाते व राहिलेला प्रसाद घेऊन येते. व देवाची इच्छा पूर्ण करते.

काका म्हणाले, "मला कळत नाही की एक तरूण स्त्री आपल्या नवऱ्याला भेटण्यासाठी उतावीळ होऊन पळत आल्यास या सत्यनारायणाला याचा का हेवा वाटावा? या प्रकारच्या गोष्टी चित्रपटातील व्हिलनला शोभतात. परंतु तो हा देव एखाद्या खलनायकाप्रमाणे वागत होता. शेवटी कलावती मेल्यानंतर सत्यलोकी पोचली असेल. ती त्या ठिकाणी कशी काय रहात असेल, ते सत्यनारायणच जाणे. त्यामुळे सत्यनारायणाचे नाव ऐकले की माझी धडकी भरते."

"काका, सत्यनारायणाच्या पूजेत चारच कथा का आहेत – एकच पुरेशी ठरली असते की."

"त्याचे काय आहे की हिदू धर्मातील चार वर्णाच्या लोकांनी पूजा करावी हा उद्देश त्यामागे असल्यामुळे प्रत्येक वर्णासाठी कथा आहेत. ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांच्यासाठी एकेक कथा आहेत. ब्राम्हण श्रीमंत झाला. क्षत्रिय राजाला काही त्रास झाला नाही. वैश्य व्यापाऱ्याचे वैभव परत आले. आणि लाकूडतोड्याला दुप्पट मजूरी मिळाली. या कथांचा हा सारांश आहे. खरे पाहता कथेत वर्णन केल्याप्रमाणे असे प्रसंग भोवताली नेहमी घडत असतात. त्या कठिण प्रसंगांचा पूजा करण्याशी वा पूजा न करण्याशी काहीही संबंध नाही.लीलावती गर्भवती झाली यात विशेष काय होते? आपल्या येथील अब्दुलला बारा मुलं आहेत. त्यानी कुठली पूजा केली होती? आपल्या शेजारच्या चौधरीच्या घरी दर महिन्याला पूजा होत असूनसुद्धा त्याला मूल का होत नाही? तो विश्वंभर भटजी आयुष्यभर देवासमोर ठणाठणा घंटा वाजवत असतो. परंतु राहण्यासाठी धड घर नाही. या उलट भिकूशेठ धान्याचा काळाबाजार करून तीन मजली घरात आरामात राहतो. सत्यनारायणांनी त्याची संपत्ती हिसकावून का घेतली नाही?"

"म्हणजे सत्यनारायणाच्या कथेत सत्य नाही असे तुम्हाला म्हणायचे आहे का?"

"जरा तूच विचार कर. सुरुवातीपासून शेवटपर्यंत या कथा ऐकताना हा सत्यनारायण कपटी, स्वार्थी, दुष्ट असावा की काय असेच वाटतो. एखाद्या दुष्ट माणसापेक्षा तो जास्त वाईट वागतो. गोष्टीतल्या माकडासारखे त्याचे एकूण वर्तन आहे. हातातील केळी फेकून देतो, अशी भीती दाखवायची व नतर गंमत म्हणून केळी तुमच्या हातात द्यायची. त्यामुळे अशा देवाची भक्ती, पूजा कशी काय करायची हा माझ्यासमोरचा प्रश्न आहे."

"परंतु सत्यनारायणाची पूजा केल्यास व भक्तीभावाने त्याची कथा ऐकल्यास हा देव प्रसन्न होऊन इष्टफळ देतो असे सांगितले जाते."

"माहित नाही. कदाचित... परंतु हाडवैर असलेले एकमेकासमोर शड्डू ठोकून उभे असलेले दोघेही पूजा करू लागले तर कुणाला इष्ट फळ मिळेल हे सांगता येईल का?"

“या कथेप्रमाणे पूजा करणाऱ्यांना फळ मिळणार आहे.”

पूजा करणाऱ्यांना फळ मिळेल की नाही हे माहित नाही. परंतु पूजा सांगणाऱ्याची इच्छापूर्ती होते हे मात्र नक्की. जो कुणी शहाण्यानी या कथा लिहिल्या आहेत त्यानी चलाखी दाखवत प्रत्येक कथेच्या शेवटी कथा ऐकणाऱ्यांनी कथा सांगणाऱ्याला भरपूर दक्षिणा द्यावी असे नमूद करायला विसरला नाही.”

“भट ब्राम्हणाला दक्षिणा न दिल्यास मालकाला फळ मिळणार नाही. म्हणजे मालकाचा पैसा व प्रसाद हडपण्यासाठी या कथा आहेत की काय?”

“नाही तर काय – कानाला भोक पाडून घेतले की खायला मिठाई मिळते या आशेने मूल कान टोचून घ्यायला तयार होते. तसाच प्रकारे गूळ, केळी, दूध, तूप दिल्यास मूल होईल, संपत्ती परत मिळेल, मजूरी दुप्पट मिळेल..... ही यादी भरपूर मोठी आहे. सामान्य लोक या भूलथापांना बळी पडतात. अशा फसवणूकीपासून त्यांचे रक्षण कसे करायचे हा माझ्यासमोरचा प्रश्न आहे. कथेमागचा उद्देश सांगितले  तरी कुणीही विश्वास ठेवत नाही. दूध केळी साखरेच्या प्रसादामुळे झालेले नुकसान कसे काय भरून येऊ शकते?  मेंढरासारखी आपली  मानसिकता आहे. एकजण करतो ना मग आपण पण करू या. म्हणूनच या देशात भेसळ करणारे, भ्रष्ट असणारे सुखाने जगतात. व खरे बोलणारे, प्रामाणिकपणे राहणारे दुखी कष्टी जीवन जगतात.”

“मग यावर उपाय काय?”

“शक्य झाल्यास सत्याची पाठ सोडू नका. जिथे तिथे असत्य, अन्याय, फसवणूक, भ्रष्टाचार, काळाबाजार असेल त्याला विरोध करा. लोकांना खरे काय आहे ते तरी कळू दे. हाच खरा सत्याग्रह. तीच सत्याची पूजा....”